एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी - २)
आर्थिक वर्ष २०१५-१६ साठी वनामती, नागपूर या संस्थेस अनुदान वितरीत करण्याबाबत........

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन ०४१५/प्र.क्र.५१/१५/१८-ब**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : २४ एप्रिल, २०१५.**

वाचा : सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : बीयुडी-२०१५/प्र.क्र. ७९/ २०१५/ २५, दि. ८ एप्रिल, २०१४.

**शासन निर्णय** : -

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २० जानेवारी,२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ व गट-ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेला सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या खर्चासाठी संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये **रु. २०९४.९७ लाख (रुपये दोन हजार चौ-याण्णव लाख सत्याण्णव हजार फक्त)** इतकी तरतूद असून त्यापैकी **रु. ३४९.१६ लक्ष (रुपये तीनशे एकोणपन्नास लाख सोळा हजार फक्त)** एवढे अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. वरील अनुदानातून **एप्रिल व मे, २०१५ या दोन महिन्यांकरिता** वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेला खालीलप्रमाणे अनुदान मंजूर करण्यात येत आहे -

| लेखाशीर्ष | अर्थसंकल्पीत वितरण प्रणातील वितरीत तरतूद (रु. लाखात) |
|---|---|
| लेखाशीर्ष ए-४-२०७० इतर प्रशासकीय सेवा ००-००३-प्रशिक्षण (००)(११) वनामती, नागपूर या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन कार्यक्रमासाठी सहायक अनुदान ३१ सहायक अनुदान -(वेतनेतर) (२०७००८६२) | ३३९.८६ |
| ३६. सहायक अनुदान(वेतन) | ९.३० |
| एकूण | ३४९.१६ |

३. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

४. वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेने आर्थिक वर्ष २०१५-१६ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

५. वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल,लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

६. वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

७. वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेचे आहरण व संकवतरण अधिकारी यांना संस्थेस वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाची रक्कम रु. ३४९.१६ लक्ष (रुपये तीनशी एकोणपन्नास लाख सोळा हजार फक्त) आहरित करावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०४२४१७३३०२८९०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Haridas Bhogle

Digitally signed by Santosh Haridas Bhogle
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Santosh Haridas Bhogle
Date: 2015.04.24 17:45:00 +05'30'

**(डॉ.संतोष भोगले)**
उपसचिव,सामान्य प्रशासन विभाग

**प्रति,**

१ महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई,
२ महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२,नागपूर,
३ अ.मु.स.(सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
४ महासंचालक, यशदा, पुणे,
५ संचालक, वनामती, नागपूर.
६ लेखाधिकारी, वनामती, नागपूर (२ जादा प्रतींसह),
७ सहसंचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई,
८ जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर,
९ उप कोषागार कार्यालय, नागपूर,
१० वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११ अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्र. २५, मुंबई-३२.
१२ निवड नस्ती.